पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण
पेठ क्र. १८ व १९ मधून जाणा-या स्पाईन रस्त्यावरील ६ अनधिकृत बांधकाम धारकांचे पुनर्वसन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. ३००७/२३०९/प्र.क्र.६६/०८/नवि-२२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २६ एप्रिल, २०१०

वाचा १) या विभागाचा शासन निर्णय क्र. पीसीएन ३०२००४/१७५/प्र.क्र.१६/०४ (भाग-२/नवि२२, दिनांक २१/०८/२००४
२) या विभागाचा शासन निर्णय क्र. पीसीएन ३००७/२३०९/प्र.क्र.६६/०८/नवि२२, दिनांक ७ फेब्रुवारी, २००८.
३) या विभागाचा शासन निर्णय क्र. पीसीएन ३००७/२३०९/प्र.क्र.६६/०८/नवि२२, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. विप्रा/विभाग-१ /३३६०, दि. २० ऑगस्ट, २००९
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. विप्रा/विभाग-१ /४२०३, दि. २८ ऑक्टोबर २००९ आणि त्यासोबतचा प्राधिकरण सभा क्रमांक २८५, दि. १२.८.२००९ मधील ठराव

**प्रस्तावना-**

पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्र. १८ व १९ मधून जाणा-या स्पाईन रस्त्याचे बांधकाम जलदगतीने पूर्ण होण्यासाठी तेथील अतिक्रमणे काढून अनधिकृत बांधकाम धारकांचे पूनर्वसन करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ मधीस कलम १५४ च्या तरतूदीचा वापर करुन जाहिराती शिवाय अनधिकृत बांधकाम धारकाना प्रत्येकी १२८ चौ.मी.चा (७५० चौ.फूट सदनिका बांधता येईल, इतक्या आकाराचा) पर्यायी भुखंड सन २००४-०५ च्या प्रचलित किंमतीला प्राधिकरण समितीच्या मान्यतेने उपलब्ध करुन देण्यास संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. या शासन निर्णयास अनुसरुन प्राधिकरणाकडून यापूर्वी प्राप्त प्रस्तावानुसार संदर्भाधीन क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये एकूण ५४ अनधिकृत बांधकामधारकांना भुखंडाचे वाटप करण्यास यापूर्वी शासनाची मान्यता देण्यात आली आहे.

०२. अंकुश चौक (साईनाथ) येथील स्पाईन रस्त्यामुळे बाधीत झालेल्या १५ अनधिकृत बांधकामधारकांनी वरीलप्रमाणे पर्यायी जागा मिळण्यासाठी अर्ज केला होता. सदर १५ अनधिकृत बांधकामधारकांपैकी ६ अनधिकृत बांधकामधारकांचे खरेदीखताचे नोंदणीकृत दस्त असल्याने सदर ६ जमीन मालकांना पुनर्वसनासाठी प्रत्येकी १२८ चौ.मी.चा (७५० चौ. फुटाचे बांधकाम करता येईल इतक्या

आकाराचे) पर्यायी भुखंड सन २००४-०५ च्या प्रचलित दराने देण्याचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण क्षेत्रात विकसित करण्यात येणा-या १०० मीटर रुंदीच्या स्पाईन रोडचे महत्व लक्षात घेवून, महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ च्या कलम १५४ च्या अन्वये ५४ अनधिकृत बांधकाम धारकांना पुनर्वसनासाठी १२८ चौ.मी.चा (म्हणजेच ७५० चौ. फुटाचे बांधकाम करता येईल इतक्या आकाराचे ) पर्यायी भुखंड देण्यास शासनाने यापूर्वी मान्यता दिलेली आहे. त्याच धर्तीवर, प्राधिकरण सभा क्र. २८५ दि. २०.८.२००९ मधील विषय क्र. ३६ अन्वये पारित ठरावाप्रमाणे, मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी प्रस्तावित केल्यानुसार अंकुश चौकातील खालील नोंदणीकृत खरेदी खताचे दस्त असलेल्या ६ अनधिकृत बांधकाम धारकांना पूनर्वसनाच्या दृष्टीने, त्यांना अन्य कोणतीही नुकसान भरपाई अनुज्ञेय राहणार नाही, या अटीच्या अधिन राहून सन २००४-२००५ मधील प्रचलित दराने प्रत्येकी १२८ चौ.मी.चा (म्हणजे ७५० चौ. फुटाचे बांधकाम करता येईल इतक्या आकाराचे) पर्यायी भुखंड वाटपास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. श्रीमती विजया प्रकाश मुथा
२. श्री. सतीशकुमार बे. गोयल
३. श्री. प्रकाश मारुती केंजळे
४. श्री. बाळू मारुती केंजळे
५. श्री. विलास मारुती केंजळे
६. श्रीमती जयश्री भगवंत सांडभोर

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

(१) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
(२) मा. सचिव (नवि -२) यांचे स्विय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
(३) विभागीय आयुक्त,पुणे तथा अध्यक्ष, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे,
(४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
(५) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
(६) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२